


**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

मुख्य इमारतपहिला मजला ,, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय-मुंबई ,४०००३२.

दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७ Email ID : deskkh२-rfd@mah.gov.in


**क्र:- गौखनि-४१ अ/०२०३/प्र.क्र.८९/ख-२** दिनांक : २० मार्च, २०२४

**विषय : गौण खनिज-बीड**

सन २००४-२००५ करीता मौजे कुरणपिंप्री, ता. गेवराई, जि. बीड येथील रेतीघाटातून उत्खनन करता न आलेल्या रेतीचा परतावा मिळणेबाबत.
-श्री. पंडित भिका जाधव

**शासन ज्ञापन:**

विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र.२००६/मशाका-२/गौख/कावी-१६२, दिनांक १६.०२.२००६ रोजीच्या अनुषंगाने कळविण्यात येते की, सन २००४-२००५ करीता मौजा कुरणपिंप्री, ता. गेवराई, जि.बीड येथील वाळूगट दिनांक १५.१२.२००४ रोजी ४२०० ब्रास परिमाणाकरिता श्री. पंडीत भिका जाधव यांना रक्कम रू.६०,११,०००/- एवढ्या बोलीस मंजूर करण्यात आला. लिलावधारक यांना सदर वाळूगटाचा ताबा देण्यात आल्यानंतर जिल्हाधिकारी, बीड यांनी दिलेल्या आदेशामुळे लिलावधारकास वाळू गटाचा ताबा देण्यात आला. तदनंतर लिलावधारक यांनी वाळू उत्खननास सुरूवात केली. तथापि, मा. दिवाणी न्यायालय, बीड येथे दाखल झालेल्या दिवाणी दावा क्रमांक ०५/०५ यामुळे मा. न्यायालयाने दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने लिलावधारकास वाळू गटातून वाळू उत्खनन करता आले नाही. लिलावधारक यांनी त्यांना मंजूर परिमाणचे उत्खनन करता न आल्याने उर्वरीत वाळूच्या परिमाण उत्खनन करण्याची विनंती मा. राज्यमंत्री (महसूल) यांच्याकडे केली. त्यानुषंगाने मा. राज्यमंत्री(महसूल) यांनी दिनांक २०.०५.२०२२ च्या आदेशान्वये लिलावधारक यांना उत्खनन करता न आलेल्या २३०० ब्रास परिमाणाचे मौजे गंधारीगाव, ता. अंबड, जि. जालना या वाळू घाटातून उत्खनन करता न आलेल्या २३०० ब्रास परिमाणाचे उत्खनन करण्याबाबत आदेश पारीत केले.

०२. तथापि, मा. राज्यमंत्री (महसूल) यांच्या दिनांक २०.०५.२०२२ रोजीच्या आदेशान्वये लिलावधारकास उत्खनन करता न आलेल्या परिमाणासाठी सध्य:स्थितीत असलेल्या वाळू निर्गमित धोरणातील तरतूदीनुसार वाळूगट बदलून देणे शक्य होणार नसल्याने, लिलावधारक यांना मंजूर असलेल्या एकूण ४२०० ब्रास परिमाणामापैकी उत्खनन करता न आलेल्या २३०० ब्रास रेतीच्या परिमाणाच्या अनुषंगाने परिगणीत होणारी रक्कम रू.३२,९१,३००/- (रू.बत्तीस लाख एक्याण्णव हजार तीनशे फक्त) लिलावधारक श्री. पंडित भिका जाधव यांना परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०३. सबब श्री. पंडित भिका जाधव यांना सन २००४-२००५ करीता मौजा कुरणपिंप्री, ता. गेवराई, जि.बीड मधून उत्खनन करता न आलेल्या प्रमाणशीर परताव्याची रक्कम रू.३२,९१,३००/- (रू.बत्तीस लाख एक्याण्णव हजार तीनशे फक्त), त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे

जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास शासन ज्ञापनाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

०४. या बाबीवर होणारा खर्च सन २०२३-२०२४ या वर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२-खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०५. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दिनांक ०८.०८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३२०१५१००९१८१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SADANAND GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2024.03.20 15:20:28 +05'30'

**(सदानंद गो. मोहिते)**
**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, बीड**

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
५) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
६) निवडनस्ती “ख-२” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.